*(अल्लाह, असीम दयावंत कृपावंतच्या नावाने)*

चार हजार वर्षांपूर्वीची घटना आहे. इराकच्या भूमीत एका व्यक्तीने जन्म घेतला, ज्याने मानवी इतिहासात स्वतःची एक कायमस्वरुपी छाप सोडली आहे. ज्या काळात त्याने जन्म घेतला त्यावेळी समस्त जग नानाविध अंधश्रध्दा व मूर्तीपूजेच्या अधीन झाले होते. ज्या वंशात त्याचा जन्म झाला तो वंशही ग्रह-तारकांचा पूजक होता. चंद्र, सूर्य, इतर ग्रह त्या वंशाचे ईश्वर होते. राजघराणे याच ईश्वरांची संतान होण्याच्या नात्याने देशवासियांचा ईश्वर मानले जाई. ज्या घराण्यात त्याचा जन्म झाला ते पुरोहिताचे घराणे होते. आपल्या देशवासियांना सूर्य-तारकांच्या पुजेत गुरफटून ठेवण्यात मुख्यतः तेच घराणे कारणीभूत होते.

अशा काळात,अशा समाजात व अशा

घराण्यात या व्यक्तीने जन्म घेतला. जगाच्या परंपरेनुसार चालणारा असता तर तो पण त्याच मार्गाने चालला असता ज्या मार्गाने त्याचे वंशज, त्याचे देशबांधव व त्याच्या काळातील लोक चालत होते. त्या काळी अशी काही दृष्टी, विचारप्रणाली उपलब्ध नव्हती जी दुसऱ्या मार्गाबाबत मार्गदर्शन करेल. वस्तुतः त्याच्या घराण्याची प्रबळ इच्छा होती की, त्याने इतर मार्गाचा विचारही आपल्या मनात आणू नये, कारण सूर्य तारकापूजनाच्या धार्मिक दुकानदारीच्या बळावर त्याच्या घराण्याचा धंदा जोरात यशस्वीपणे चालत होता. परंतु तो अविचारी व अविवेकी लोकांप्रमाणे नव्हता की जे वाऱ्याच्या दिशेने वाहवत जातात.

परंपरागत भेदभावाच्या आधारावर वाडवडील व घराण्याच्या रुढीपरंपरांना तो

सत्यासत्यतेच्या कसोटीवर घासल्याशिवाय स्वीकारण्यास तयार झाला नाही. त्याने तारुण्यात पाय ठेवताच हे जाणून घेणे आवश्यक मानले की; काय ज्या विश्वास व तत्त्वांवर त्याचे वाडवडील व त्यांच्या समस्त समाजाने आपल्या जीवनाची इमारत उभी केली आहे ती खरी आहे किंवा नाही? या स्वतंत्र संशोधनासंबंधी त्याने सूर्य, चंद्र, शुक्र व त्या सर्व दैवतांचे निरीक्षण केले. त्यांच्या ईशशक्तीबाबत चर्चा तो बालपणापासून ऐकत आला होता. प्रत्येकाची तपासणी केली व पाहिले की त्यांच्या ईशशक्तीचा समज कितपत सत्य आहे. आणि शेवटी तो या निष्कर्षाप्रत आला की हे सर्व बंदे (दास, निर्मिती) आहेत. ईशशक्ती फक्त त्या एका निर्विकारी शक्तीची आहे ज्याने पृथ्वी व आकाशांची निर्मिती केली आहे.

जेव्हा हे सत्य त्याला पटले तेव्हा त्याने

इतरांप्रमाणे एखाद्या बाबीस सत्य मानून व समजल्यानंतरही न स्वीकारण्याची चूक केली नाही. सत्य जाणल्यानंतर त्यास स्वीकारण्यास त्याने क्षणाचाही विलंब लावला नाही. त्वरीत कबूल केले की ''मी नतमस्तक होत आहे त्या ईश्वरासमोर जो पृथ्वी व आकाशांचा निर्माता आहे.'' हे सत्य स्वीकारल्यानंतर त्याने आपल्या कुटुंबात व समाजासमोर जाहीर केले की माझा मार्ग तुमच्यापेक्षा वेगळा आहे. ''मी अनेकेश्वरवादात अधर्म (शिर्क) व मुर्तीपूजनात तुमच्याबरोबर नाही.'' या व्यक्तीचं हे पहिलं समर्पण (कुर्बानी) होतं. ही पहिली सुरी होती जी त्याने वाडवडिलांच्या अंधश्रध्देवर, खानदानी व वांशिक भेदभावावर आणि त्या सर्व इंद्रियांच्या दोषांवर चालविली होती. माणूस आपल्या अंतरात्म्याच्या हाकेविरुध्द अशा मार्गावर फक्त याच्यासाठी चालत असतो की खानदान, वंश व जग

याच मार्गवर चालत आले आहे.

या सत्यस्वीकृतीला जाहीर केल्यावर ती व्यक्ती स्वस्थ बसली नाही. त्याच्यावर हे सत्य स्पष्ट झाले होते की या विश्वाची मूळ वास्तवत: एकेश्वरत्व आहे आणि अनेकश्वरत्व धादांत खोटा आणि निराधार वाद आहे. हे सत्य जाणल्यानंतर तो हेही जाणून चुकला की, ते सर्व मानव जे एक ईश्वराबरोबर इतर दैवतांवर श्रध्दा ठेवतात व या अनेकेश्वरवादी श्रध्देवर आपल्या धर्म नीतीची इमारत उभारत आहेत, तर वस्तुत: त्यांनी आपले घरटे एका नाजूक फांदीवर बनविले आहे, ज्यास कोणताही पाया नाही. ही जाणीव झाल्यावर ती व्यक्ती बेचैन झाली. आपल्या लोकांना अनेकेश्वरवादी श्रध्देपासून परावृत करावे व एकेश्वरत्वाकडे आमंत्रित करण्याच्या कर्तव्याची जाणीव त्यास झाली.

त्यास कल्पना होती की त्यांच्या राष्ट्रधर्माविरुध्द जाहीररीत्या प्रचार केल्यास त्यास पुरोहितापदास मुकावे लागेल. त्यास हेही माहीत होते की जर त्याचे घराणे राष्ट्रधर्मापासून दूर झाले तर ती सर्व सत्ता संपेल जी या देशात त्यास प्राप्त आहे. त्यास ही कल्पना होती की सत्याच्या प्रचारामूळे समस्त धर्मबांधव रागाने भडकतील. हा धर्मप्रचार त्यास पुरोहितपदावरून पदच्युत करेल, कारण शाही घराण्याच्या मानमरातबाचा पाया हा होता की तो या देवतांचा पुत्र आहे. या तत्त्वानुसार त्यांचा मूळ विचार एकेश्वराविरुध्द आहे, याची त्यास कल्पना होती. हे सर्वकाही माहीत असूनही कर्तव्यपूर्तीसाठी तो उभा ठाकला. स्वतःचा पिता, घराणे, आपला समाज व राज्यकर्त्यासिसुध्दा अनेकेश्वरवादी श्रध्देपासून परावृत होऊन एकेश्वरत्वाकडे येण्याचे त्याने आमंत्रण दिले.

जितका जास्त त्यास विरोध झाला तितकीच जास्त त्याची कृतीशीलता वाढत गेली. शेवटी अशी वेळ आली की एकीकडे तो एकटा व दूसरीकडे त्याच्या स्पर्धेत राज्यकर्ता, घराणे, कुटुंब इतकेच नव्हे तर त्याचा स्वत:चा पितासुध्दा विरुध्द पंक्तीत उभा होता. आता संपूर्ण राज्यात त्याचा कोणीही मित्र नव्हता. एवढा विरोध होऊनही त्याने धीर सोडला नाही आणि सत्याचा प्रचार करून त्याचे तोंड दुखले नाही. तेव्हा निर्णय घेतला गेला की त्यास जाहीररीत्या सर्वासमक्ष जिवंत जाळावे. परंतु इतक्या कठोर देहदंडाची भीती त्यास सत्यास सत्य व असत्यास असत्य बोलण्यापासून परावृत्त करू शकली नाही. त्याने आगीत झोकून घेणे मान्य केले, परंतु हे मान्य केले नाही की ज्या सत्यावर त्याने श्रध्दा (ईमान) ठेवली ती अमान्य करावी व सत्यवचन सोडून द्यावे. या व्यक्तीचे हे दुसरे अत्युच्च समर्पण (कुर्बानी) आहे.

कोण जाणे ईश्वराने त्यास आगीत जळण्यापासून कसे वाचविले! या खतरनाक घटनेतून सहिसलामत वाचल्यानंतर त्यास त्या देशात थांबणे अशक्य होते. शेवटी त्याने स्वदेश सोडून जीवन व्यतीत करणे स्वीकारले. शेजारी देशात जेथे जेथे तो जाऊ शकत होता ते सारे देश मूर्तीपूजक होते. कोठेही एकेश्वरवादी असा छोटासाही समाज वा कुटुंब नव्हते, ज्यांच्यापाशी तो आश्रय घेऊन शांत जीवन जगू शकेल. अशा परिस्थितीत शांत जीवनप्राप्तीचा एकच मार्ग मोकळा होता की त्याने आपला देश सोडल्यानंतर सत्याचा प्रचार बंद करावा. हाच वैयक्तिकदृष्ट्या जर एखादी अनोळखी व्यक्ती एखाद्या धर्माचा अवलंब करीत असेल तर दुसऱ्या देशाचे लोक निष्कारण त्याला त्रास का बरे देतील? शिवाय त्यांना याचा धर्म कोणता आहे हे माहीत होण्याचेही कारण नव्हते. परंतु हा अल्लाहचा दास दुसऱ्यांच्या देशात

जाऊनही गप्प बसला नाही. जेथे जेथे तो गेला तेथे त्याने सर्व उपासकांना आमंत्रण दिले व सांगितले,

"अनेकांची उपासना सोडा व एकाच परमेश्वराची उपासना करा."

याचा परिणाम हा झाला की स्वदेशातून बाहेर पडूनही निश्चित जीवन त्याच्या नशिबी नव्हते. सिरियात तर कधी पॅलेस्टाईनमध्ये, कधी इजिप्त तर कधी रियाध. त्याचे देशा-देशाची पायपीट करण्यात सारे जीवन संपले. त्याला न घर, शेतीवाडी गुरे ढोरे, व्यवसाय धंद्याची गरज होती. त्यास ऐहिक सुखी जीवन व संसाराची इच्छा नव्हती. इच्छा होती फक्त त्या सत्याची ज्यावर त्याची श्रध्दा होती. ते सत्य ज्येष्ठ, श्रेष्ट व्हावे आणि लोकांनी भरकटलेला मार्ग सोडून सत्य मार्गावर चालावे. त्यात त्यांचेच भले आहे. हीच इच्छा त्याला ठिकठिकाणी घेऊन जात होती.

याच सदिच्छेपोटी त्याने सर्व स्वार्थाचा त्याग केला. या व्यक्तीचं हे तिसरे समर्पण (कुर्बानी) आहे.

भटके व कफल्लक जीवन जगत भटकंती करत जेव्हा तो उतारवयात आला तेव्हा ईश्वराने (अल्लाह) त्यास एक पुत्ररत्न प्रदान केलं. पुत्राचं पालनपोषण केलं. जीवन जगण्याच्या धावपळीत साथ मिळेल, मातापित्यांच्या कामात हातभार लावील एवढं त्याच वय झालं. पुत्र, तोही एकुलता एक. शिवाय ऐन तारुण्य व उमेदीत पोचलेला. पिता तरुण पुत्राच्या आधाराच्या भावनेने परावलंबी होतो तेव्हा प्रत्येक व्यक्ती अशा परिस्थितीची कल्पना व अंदाज करु शकते की अशा वयात तो पुत्र पित्यास किती प्रिय असेल. परंतु मुस्लिमची व्याख्या ही आहे की त्यास ईश्वर (अल्लाह) व त्याच्या मर्जीपेक्षा काहीही प्रिय नाही. यासाठी ती सर्व समर्पणं पुरेशी वाटली

नाहीत म्हणून की काय, ही सर्व समर्पणं आपल्या ईश्वरासाठी तो करीत राहिला.

या सर्व समर्पणांनंतर त्याची अंतिम परीक्षा घेणे गरजेचे मानले गेले. ती परीक्षा ही होती की काय ही मूस्लिम व्यक्ती आपल्या अतिप्रिय पुत्राचे पण ईश्वराच्या (अल्लाह) प्रेमासाठी समर्पण करु शकते किंवा नाही? ही परीक्षासुध्दा घेण्यात आली व जगाने पाहिले की तो वृध्द आपल्या ईश्वराचा (अल्लाह) आदेश नव्हे, केवळ एक इशारा मिळताच एकुलत्या एक तरुण पुत्रास स्वतः आपल्या हाताने समर्पण (जुबाह- शिरच्छेद) करण्यास तयार झाला. ही गोष्ट वेगळी की ईश्वराने शिरच्छेदसमयी पुत्राच्या जागी मेंढरू मान्य केलं. ईश्वरास मुलाच्या रक्ताची गरज नव्हती. केवळ ईशप्रेमाची परीक्षा अभिप्रेत होती. या सच्चा मुस्लिमाने मनोभावे प्राणप्रिय पुत्र ईश्वराच्या

(अल्लाह) एका ईशाऱ्यावर समर्पित केला होता.

हे होतं त्या व्यक्तीचं शेवटचं आणि सर्वांत महान समर्पण! (कुर्बानी!) जे आपल्या इस्लाम, ईमान व ईश्वरावरील विश्वासाचं प्रतीक आहे. याच्या मोबदल्यात ईश्वराने (अल्लाह) त्यास समस्त जगातील मानवांचे नेतृत्व (इमामपद) प्रदान केले आणि त्याच्याशी मैत्री ठेवून अत्युच्च स्थान बहाल केले.

हा उल्लेख आहे त्या व्यक्तीचा ज्याला आज आम्ही सर्व माननीय इब्राहीम (अ.) या नावाने ओळखतो. हेच ते समर्पण (कुर्बानी) आहे ज्याची आठवण आज जगभरातील मुस्लिम निवडक पशुंची कुर्बानी देऊन साजरी करतात. हेतू हा की मुस्लिमांच्या आंतर्मनात समर्पणाची तीच भावना, इस्लाम व विश्वासाची (ईमान) तीच आवड आणि ईश्वराशी प्रेम व इमानदारीची तीच शान निर्माण

व्हावी ज्यांचे प्रात्यक्षिक माननीय इब्राहीम (अ) यांनी आपल्या संपूर्ण आयुष्यात केलं होतं. जर एखादी व्यक्ती एका पशुवर केवळ सुरा फिरवित असेल पण त्या पशुविषयी त्याच्या मनात प्रेम नसेल तर ही एक नाहक पशुहत्या आहे.

ईश्वराला (अल्लाहला) पशुच्या रक्त-मांसाची भूक नाही. या ठिकाणी हे अभिप्रेत आहे की ज्या व्यक्तीने 'ला-इलाहा इलल्लाह' (अल्लाह शिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही) वर श्रध्दा (ईमान) ठेवली त्याने पूर्णपणे ईश्वराचा पाईक होऊन राहावे. भेदभाव, स्वार्थ, विशेष रुची, बाह्य दडपण, लालसा, भीती व नुकसान, आंतरिक कमकुवतपणा व बाह्य शक्ती त्यास सत्यमार्गापासून परावृत्त करू शकणार नाहीत. एकदा ईश्वरावर (अल्लाह) श्रध्दा ठेवल्यानंतर त्याने दुसऱ्या कोणास आपले दैवत मानू नये. त्याला

कोणाशीही असलेला संबंध तोडता येणे सोपे असावे परंतु ईश्वराशी असलेला संबंध त्याने जोडलेला आहे तो तोडता येणे त्यास कोणत्याही परिस्थितीत अशक्य व्हावे. हेच सर्मपण (कुर्बानी) इस्लामचे खरेखुरे सत्य आहे. कोणत्याही काळापेक्षा आज याची आम्हास अत्यंत गरज आहे की हे सत्य आमच्या मनी कायमस्वरूपी वसावे. जेव्हा जेव्हा मुस्लिमांना जगात हार खावी लागली त्या काळी मुस्लिम या सत्यापासून दूर होते.

**—०— समाप्त —०—**